## महाराष्ट्र शासन

क्रमांक :- सनित- १६२३/ प्र.क्र.१३२/१३स,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
मंत्रालय, विस्तार इमारत,
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ११ जुलै, २०२३.

**संदर्भ** :-१. शासनाचा क्रमाकं:- संकीर्ण- १२२३/ प्र.क्र.१३२/१३स, दिनांक २८ जून,२०२३ रोजीचा आदेश.

२. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र.रासनिप्रा / कक्ष-११/ गृहनिर्माण / निवडणूक/ ४९३४/२०२३, दिनांक ०४.०७.२०२३ रोजीचे पत्र.

### आदेश

ज्याअर्थी, राज्यात ३० जून नंतर पर्जन्यमानाचे स्वरूप जास्त असल्याने उद्भवणारी नैसर्गिक आपत्ती, पावसामुळे जनजीवन व वाहतूक व्यवस्था विस्कळीत होण्याची शक्यता तसेच, सदर परिस्थिती पूर्वपदावर येण्यास लागणारा कालावधी विचारात घेता जास्तीत जास्त मतदारांना निवडणूकीमध्ये सहभाग नोंदवता यावा यासाठी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील कलम १५७ अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकारात कलम ७३कक मधील तरतूदीला सुट देवून २५० किंवा त्यापेक्षा कमी सदस्य संख्या असलेल्या सहकारी गृहनिर्माण संस्था तसेच, ज्याप्रकरणी मा.सर्वोच्च / मा.उच्च न्यायालयाने निवडणूक घेण्याचे आदेशीत केले आहे अशा सहकारी संस्था वगळून तसेच, ज्या सहकारी संस्थांची निवडणूक प्रक्रिया पुर्ण झाली आहे परंतु, अध्यक्ष व उपाध्यक्ष यांची निवड होणे बाकी आहे अशा संस्था वगळून, राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणूका या आदेशाच्या दिनांकापासून ज्या टप्प्यावर असतील त्या टप्प्यावर दिनांक ३० सप्टेंबर, २०२३ पर्यंत पुढे ढकलण्यात आल्या आहेत,

ज्याअर्थी, सहकारी गृहनिर्माण संस्थेचे कार्यक्षेत्र एकाच परिसरापुरते मर्यादित असून बहुतांश गृहनिर्माण सहकारी संस्था या शहरी भागातील असल्याने तसेच, सहकारी गृहनिर्माण संस्थांचे सभासद शेतीच्या कामामध्ये व्यस्त असण्याची शक्यता कमी आहे. त्यामुळे, २५० पेक्षा जास्त सदस्य

संख्या असणाऱ्या सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या निवडणुकीसंदर्भात कोणताही प्रश्न निर्माण होण्याची शक्यता कमी असल्यामुळे सदर संस्थांचा पुर्व नियोजित निवडणूक कार्यक्रम सुरू करणे यथोचित होईल,

त्याअर्थी, उपरोक्त सर्व बाबी विचारात घेता २५० पेक्षा जास्त सदस्य संख्या असणाऱ्या सहकारी गृहनिर्माण संस्थांचा पुर्व नियोजित निवडणूक कार्यक्रम घेण्यास या आदेशान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७११११८०३५८३२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL JAYRAM CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2023.07.11 18:05:01 +05'30'

**(अनिल ज.चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. विभागीय सहनिबंधक/ जिल्हा उपनिबंधक/ उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
४. निवडनस्ती, कार्यासन १३-स.